आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-वाणिज्यिक पिके, कापूस या योजनेचा सन २०१८-१९ मधील अखर्चित निधी सन २०१९-२० मध्ये वितरीत करण्यास व खर्च करण्यास मान्यता.

**लेखाशिर्ष (२४०१ अे५७५), (२४०१ अे५८४), (२४०१ A५९३ ), (२४०१ A६०१).**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ७ / कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: ८ नोव्हेंबर, २०१९.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.१.०४.२०१९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.८.०७.२०१९.

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. बीयुडी-२०१९/ प्र.क्र.७/का-६, दि.१७.१०.२०१९.

४) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. राअसुअ-१०१९/ प्र. क्र.६३/ ४-अे.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान - वाणिज्यिक पिके (कापूस व ऊस ) या योजनेकरीता मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) आदिवासी उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (२३) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - कापूस (केंद्र हिस्सा) (२४०१ A५७५ ), ३३- अर्थसहाय्य खाली रु. २०.८३ लाख तर त्यास समरुप राज्य हिश्याकरिता (०१) (२४) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके- कापूस (राज्य हिस्सा ) ( २४०१ A५८४) याखाली रु. १३.८८ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तसेच (०१) (२५) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - ऊस (केंद्र हिस्सा) (२४०१ A५९३ ), ३३- अर्थसहाय्य खाली रु. २६.०६ लाख तर त्यास समरुप राज्य हिश्याकरिता (०१) (२६) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके- ऊस (राज्य हिस्सा ) ( २४०१ A ६०१) याखाली रु. १७.३७ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीतून कापूस पिकाच्या केंद्र व राज्य हिश्श्याकरीता अनुक्रमे रू.१३.०५ लाख व रू.८.७० लाख इतका तर ऊस पिकाच्या केंद्र व राज्य हिश्श्यांकरीता अनुक्रमे रू.४.८२लाख व रू.३.२१ लाख निधी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागास वितरीत करण्यात आला आहे.

२. उपरोक्त योजनेंतर्गत सन २०१८-१९ मधील अखर्चित निधी केंद्र शासनाने पुनरूज्जीवित केला आहे. या अनुषंगाने कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ४ येथील प्रस्तावास अनुसरुन कापूस व ऊस पिकाकरीता केंद्र हिश्श्याकरीता व समरूप राज्य हिश्श्यांकरीता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सन २०१८-१९ या वर्षातील अखर्चित एकूण रू.४१.७८ लाख ( अक्षरी रुपये एक्केचाळीस लाख अठठ्यात्तर हजार फक्त ) इतका निधी सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पित तरतूदीतून प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास व खर्च करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| योजनेचे नांव व लेखाशिर्ष | सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पित निधी | दि.१७.१०.२०१९ च्या शा.नि.द्वारे वितरीत निधी | या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला सन २०१८-१९ या वर्षातील अखर्चित निधी |
|---|---|---|---|
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - कापूस (२४०१ A५७५ ) (केंद्र हिस्सा) | २०.८३ | १३.०५ | **६.११** |
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके- कापूस (२४०१ A५८४) (राज्य हिस्सा) | १३.८८ | ८.७० | **४.०७** |
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके - ऊस (२४०१ A५९३ ) (केंद्र हिस्सा) | २६.०६ | ४.८२ | **१८.९६** |
| कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके- ऊस ( २४०१ A ६०१) (राज्य हिस्सा ) | १७.३७ | ३.२१ | **१२.६४** |
| **एकूण** | | **२९.७८** | **४१.७८** |

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२३१/ व्यय-१, दि.९.०९.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०७१५५४२५६७२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2019.11.08 16:38:38 +05'30'

( किरण कि.पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/व्यय १/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग